**सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता मागणी क्रमांक एक्स-१ मुख्य लेखाशिर्ष " २२३५-२०७२ महिला व बाल कल्याण संचालनालय " या लेखाशिर्षाअंतर्गत वितरीत करावयाच्या निधीबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: पुरमा-२०१८/प्र.क्र.९२/का-७अ**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मंत्रालय,मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: २१ जानेवारी, २०१९.

**संदर्भ:-** १) शासन परिपत्रक वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि. २ एप्रिल, २०१८.
२) शासन परिपत्रक,महिला व बाल विकास विभाग क्र. बीजीटी- २०१८/प्र.क्र. ३३/का-४, दि. ५ एप्रिल, २०१८
३) शासन निर्णय क्रमांक: मबाआ-२०१८/प्र.क्र.६६/का-७अ, दिनांक १४ सप्टेंबर, २०१८.
४) वित्त विभागाचे परिपत्रक क्र. पुरक-२०१८/प्र.क्र.१३५/अर्थ-३, दिनांक ५.१२.२०१८

**प्रस्तावना:**

वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक-१ येथील परिपत्रकानुसार सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी माहे डिसेंबर, पर्यतचा ९ महिन्यांचा खर्च भागविण्यासाठी अनिवार्य व कार्यक्रमावरील खर्चाचा अर्थसंकल्पित निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ७०% च्या मर्यादेत अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीद्वारे संदर्भाधीन क्र. ३ येथील शासन निर्णयानुसार वितरीत करण्यात आला आहे. हिवाळी अधिवेशन २०१८ मध्ये पुरवणी मागणीद्वारे रु. २८३.६४ लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. त्यापैकी ७०% च्या मर्यादेत निधी वितरीत करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

मागणी क्रमांक-एक्स-१ मुख्य लेखाशिर्ष २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, ००१ संचालन व प्रशासन (०१)(०१) महिला व बाल कल्याण संचालनालय,( २२३५ २०७२) १३- कार्यालयीन खर्च या लेखाशिर्षाखाली हिवाळी अधिवेशन २०१८ मध्ये पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पित निधी रु. २८३.६४ लक्ष पैकी ७०% च्या मर्यादेत रु. १,९८,५४,८००/- ( अक्षरी रुपये एक कोटी अठ्ठयान्नव लाख चौपन्न हजार आठशे फक्त ) इतका निधी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीद्वारे वितरीत करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे हे राहतील त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे. त्यानुसार आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांनी वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक-१ येथील दिनांक २.४.२०१८ व संदर्भाधीन क्रमांक ४ दिनांक ५.१२.२०१८ च्या परिपत्रकामध्ये नमूद केलेल्या तपासणी सूचीतील बाबींची तसेच यासंदर्भात नियोजन विभाग व वित्त विभागाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना, प्रचलित निकष, वित्तीय अधिकाराचे प्रत्यायोजन यांचे काटेकोर पालन करावे.

३. याबाबत सन २०१८-१९ करीता वरील लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेला निधी खर्च होईल व त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करणे, याची दक्षता आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे यांनी घ्यावी.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक १ येथील दिनांक २.४.२०१८ व संदर्भाधीन क्र. ४ दि. ५.१२.२०१८ च्या परिपत्रकामधील तरतुदीच्या अधिन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१९०१२११७३२४०७६३० असा आहे. सदरचा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Lalsing
Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, serialNumber=4ca059ab7b8d64aaf749fe58e0a714a015f521cb28fd2204e49a4d81f12a5745, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2019.01.21 17:35:17 +05'30'

**( ला.रा.गुजर )**
सह सचिव,महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे
२) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई
३) महालेखापाल १/२, ( लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई शहर/मुंबई उपनगर
५) वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे ( आयुक्तालय,पुणे मार्फत )
६) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी(आयुक्तालय,पुणे मार्फत)
७) सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी (आयुक्तालय,पुणे मार्फत)
८) कार्यासन (व्यय-६/अर्थसंकल्प-७) वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
९) कक्ष अधिकारी(का.४), महिला व बाल विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
यांना सदर निधी वितरीत करण्याच्या विनंतीसह अग्रेषित.
१०) निवड नस्ती-का-७ अ